महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील विशेषज्ञ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२२/प्र.क्र.२२/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत,१० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : २२ एप्रिल, २०२२

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४), ४(५) आणि कलम ६ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील विशेषज्ञ संवर्गातील (वेतनस्तर एस-२३ : ६७७००-२०८७००) अधिकाऱ्यांची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहेत.:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| ०१. | डॉ. मो. असलम जमाल अब्दुल कहार आरिफ, वैद्यकीय अधिकारी (क्षयरोग चिकित्सा), सामान्य रूग्णालय, खामगांव. | वैद्यकीय अधिकारी (भिषक), स्त्री रूग्णालय, अकोला (रिक्त पदी) (तात्पुरता संवर्ग बदलून) (विनंतीनुसार) |
| ०२. | डॉ. राजकुमार व्ही. जगताप, वैद्यकीय अधिकारी (बालरोग तज्ञ), जिल्हा रूग्णालय, भंडारा. | वैद्यकीय अधिकारी (बालरोग तज्ञ), जिल्हा रूग्णालय, सातारा. (रिक्त पदी) (विनंतीनुसार) |

२. डॉ. मो. असलम जमाल अब्दुल कहार आरिफ यांना तात्पुरत्या स्वरूपात संवर्ग बदलून जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील पदावर बदलीने पदस्थापना देण्यात आली आहे. सदर पदाकरीता जिल्हा शल्यचिकित्सक संवर्गातील अधिकारी उपलब्ध झाल्यास डॉ. आरिफ यांना त्यांच्या मूळ संवर्गात बदलीने पदस्थापना देण्यात येईल.

३. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई यांना व शासनास सादर करावा.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यास कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. बदली झालेल्या अधिकाऱ्याने त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती "अनधिकृत अनुपस्थिती" म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

६. जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचेविरुध्द आयुक्तालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

७. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

८. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२२११२५२५१२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, serialNumber=9474e7143b2bc3fd96e8d7bf07d1ce51de8461d4c34ae1e3f643c11b54523936, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2022.04.22 14:56:36 +05'30'

(चंद्रकांत ह. वडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा (१/२), मुंबई /पुणे.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
४) उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला / नागपूर/ पुणे.
५) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा/ अकोला/ भंडारा/ सातारा.
८) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, अकोला /भंडारा
९) अधिक्षक, सामान्य रुग्णालय, खामगाव, जि.बुलढाणा
१०) अधिक्षिका, स्त्री रुग्णालय, अकोला
११) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहाय्यक
१२) मा. मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
१३) अपर मुख्य सचिव, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१४) प्रधान सचिव (२), सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१५) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेमार्फत)
१६) निवड नस्ती (सेवा - २)